अपर जिल्हाधिकारी, जव्हार, जि.पालघर यांच्या कार्यालयाकरीता नवीन ११ अस्थायी पदे निर्माण करण्यास मंजुरी देण्याबाबत.....

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१४/प्र. क्र. १३५/ई-८,

जागतिक व्यापार केंद्र, सेंटर १ इमारत, ३२ वा मजला,
कफ परेड, कुलाबा, मुंबई-४०० ००५.
तारीख: ०१/११/२०१४.

**वाचा:-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक-आरईएन-२७९२/४००५/प्र. क्र.१९४/म-१०, दि. २७/०१/१९९३.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र. क्र.६६(भाग-२)/ई-८, दि. २०/०३/२००६.
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक-आरईएन-२००८/५४२/प्र. क्र.८०/०८/म-१०, दि. ३१/०८/२००९.
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक-एसईटी-२००७/प्र. क्र.१८०/ई-८, दि. १३/१२/२०१०.
५) शासन निर्णय, ग्राम विकास व जल संधारण विभाग, क्रमांक-ग्रापंनि-२०१२/प्र. क्र.४९/पंरा-२, दि. १४/०५/२०१२
६) जिल्हाधिकारी, ठाणे यांचे आदेश क्र.सामान्य-१/कक्ष-१/टे-१/आस्था/ममं-१/२०१०, दि.११/२/२०१०.
७) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक-ईएसटी-२६१४/प्र. क्र.६२/ई-८, दिनांक १७/०४/२०१४.
८) शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग, क्रमांक-प्राफेब-११०८/प्र. क्र.१६७/ठाणे/म-१०, दि. १७/०६/२०१४.
९) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांचे क्रमांक मशा/ आस्था/ कार्या-३/ इएनजी/सीआर-४४१५/२०१४, दि.  /०७/२०१४ चे पत्र.
१०) जिल्हाधिकारी, पालघर यांचे क्र.जिपा/आस्था/कावि-०८/२०१४, दि.०४/०८/२०१४ चे पत्र
११) वित्त विभागाचे पृष्ठांकन क्र.पदनि-२०१४/प्र. क्र.५४/१४/विसु-१, दि.११ /०८/२०१४.

**प्रस्तावना:-**

महसूल विभागाच्या नियंत्रणाखालील क्षेत्रिय स्तरावरील कार्यालयाकरीता अधिकारी/कर्मचारी

यांच्या पदांचा आकृतीबंध दिनांक २०/०३/२००६ च्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आला आहे. दिनांक १९/०७/२०१४ रोजी मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीमध्ये याबाबत सविस्तर चर्चा करण्यात येवून नवनिर्मित पालघर जिल्ह्याचा समावेश मध्यम जिल्हा म्हणून करण्याचे ठरले. आणि पालघर जिल्हाधिकारी कार्यालयासाठी १०२ पदांच्या निर्मितीस मान्यता दिली. परिणामी दि.३१/०७/२०१४ च्या शासन निर्णयान्वये पालघर जिल्हाधिकारी कार्यालयासाठी १०२ नविन अस्थायी पदे निर्माण केली आहेत.

शासनाने संदर्भाधीन दि.२७/०१/१९९३ च्या शासन निर्णयांन्वये ११ पदे अपर जिल्हाधिकारी, जव्हार, यांच्या कार्यालयाकरीता विशेषरित्या मंजुर केली होती. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई व जिल्हाधिकारी, पालघर यांनी अप्पर जिल्हाधिकारी, जव्हार यांच्या कार्यालयासाठी ११ पदे आकृतीबंधा व्यतिरिक्त मंजूर करण्याची विनंती केली आहे. सदरचा प्रस्ताव दिनांक ०७/०८/२०१४ रोजी मुख्य सचिव महोदयांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीस सादर करण्यात आला. उक्त समितीच्या बैठकीमध्ये चर्चा केल्यानुसार सदरहू १०२+११=११३ पदे पालघर जिल्ह्यासाठी मंजुर केली आहेत.

**शासन निर्णयः-**

अप्पर जिल्हाधिकारी, जव्हार, जिल्हा पालघर या कार्यालयासाठी १०२ अस्थायी पदांच्या आकृतीबंधा व्यतिरिक्त खालील नवीन ११ पदे पालघर जिल्ह्याच्या आस्थापनेवर मंजूर करण्यास शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र. | संवर्गनिहाय पदे | वेतन श्रेणी रुपये | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १. | उप जिल्हाधिकारी | १५,६००-३९,१०० (ग्रेड पे ५४००) | १ |
| २. | तहसिलदार | १५,६००-३९,१०० (ग्रेड पे ५०००) | २ |
| ३. | अव्वल कारकून | ५,२००-२०,२०० (ग्रेड पे २८००) | २ |
| ४. | मंडळ अधिकारी | ५,२००-२०,००० (ग्रेड पे ३५००) | १ |
| ५. | लिपिक | ५,२००-२०,२०० (ग्रेड पे १९००) | ४ |
| ६. | वाहनचालक | ५,२००-२०,२०० (ग्रेड पे १९००) | १ |
| | | **एकूण---** | **११** |

२. सदरहू पदांचा खर्च "मागणी क्रमांक सी-१, २०५३-जिल्हा प्रशासन, (००) ०९३, जिल्हा आस्थापना, (०१) सर्वसाधारण आस्थापना, (०१) (०१) आयुक्त कोकण, (२०५३ ००२८)" या

लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व वित्तीय वर्षाच्या मंजुर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदरहू शासन निर्णय, मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक ७/८/२०१४ रोजी ८७ व्या बैठकीत दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०३११२११०६८९१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: CN = Chandrakant Nivrutti Padale, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.11.01 18:32:54 +05'30'

**( चं. नि. पाडळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
जिल्हाधिकारी, ठाणे.
जिल्हाधिकारी, पालघर.
प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र १ / २, ( लेखा व अनुज्ञेयता ) , मुंबई-२०.
प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र १ / २, (लेखा परीक्षा), नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर.
कक्ष अधिकारी, अर्थ-१२, व्यय-९ व वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग, मुंबई.
निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, कफ परेड, मुंबई-०५.